विकास योजना - नागपूर
मौजे दाभा येथील खसरा क्र. १०९, ११०(भाग), १११ व ११२ (भाग) मधील क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३७(२) अन्वये मंजुर फेरबदल प्रस्ताव

260/नाग्र-२० 29/2/08

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.टिपीएस-२४०७/२९६२/प्र.क्र.२५२/०८/नवि-९,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,
दिनांक: ३१ ऑगस्ट, २००९

**शासन निर्णय** :- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाचे असाधारण राजपत्रात कृपया प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्रदीप गोहिल)
कार्यासन अधिकारी

प्रति,
१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर,
२) सभापती, नागपुर सुधार प्रन्यास, नागपूर.
३) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
४) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) जिल्हाधिकारी, नागपूर.
६) उप सचिव, (नगर रचना) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) उपसंचालक, नगररचना, नागपूर विभाग, नागपूर,
८) सहायक संचालक नगर रचना, नागपूर शाखा, नागपूर.
(त्यांना विनंती की, सोबतच्या अधिसुचनेतील मंजूर फेरबदल प्रस्तावानुसार अधिप्रमाणित करण्यासाठी भाग नकाशाच्या ३ प्रती शासनास कृपया सत्वर सादर कराव्यात)
९) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, नागपूर
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाचे असाधारण राजपत्रात नागपूर विभागीय पुरवणी भाग-१ मध्ये, प्रसिध्द करण्यात येऊन त्यांच्या प्रत्येकी ०५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठविण्यात याव्यात.)
१०) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग
यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसुचना विभागाच्या वेब साईटवर ठेवावी.
११) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

**अधिसूचना**

**नगर विकास विभाग**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**

**दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९**

***महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६***

**क्रमांक : टीपीएस- २४०७/२९६२/प्र.क्र.२५२/०८/नवि-९:** ज्याअर्थी, नागपूर शहराची सुधारित विकास योजना ही शासन अधिसूचना नगर विकास विभाग क्र. टीपीएस-२४९६/२६४३/प्र.क्र.३००(अ)/९७/नवि-९, दिनांक ७/१/२००० अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक १.३.२००० पासून अंमलात आली आहे. (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधिले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत मौजे दाभा येथील खसरा क्र. १०९, ११०(भाग), १११ व ११२(भाग) मधील क्षेत्र कृषी विभागात समाविष्ट आहे. (यापुढे "उक्त क्षेत्र" असे संबोधिले आहे)

आणि ज्याअर्थी, नागपूर सुधार प्रन्यासने त्यांचे पत्र क्रमांक अधी.अभि./रचना/६६८८, दिनांक १० डिसेंबर, २००७ अन्वये उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ चे (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३७)(यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधीलेला) कलम ३७ चे उप कलम (१) अन्वये फेरबदलाचा प्रस्ताव (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिलेले आहे) आवश्यक ती वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन शासनास मंजूरीसाठी सादर केला आहे;

आणि ज्याअर्थी, आवश्यक त्या चौकशीनंतर व संचालक नगररचना यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्ताव मंजूर करणे आवश्यक आहे असे शासनाचे मत झाले आहे.

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ३७ पोटकलम (२) अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकाराचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्तावास शासन मंजूरी देत आहे आणि त्यासाठी उपरोल्लिखित दिनांक ७ जानेवारी, २००० ची विकास योजना मंजूरीची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे.

उक्त विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेतील फेरबदल नोंदीच्या अनुसूचित, शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे-

## नोंद

"मौजे दाभा येथील खसरा क्र. १०९, ११०(भाग), १११ व ११२(भाग) मधील क्षेत्र खालील अटीवर कृषी विभागातून वगळून नकाशात दर्शविल्यानुसार रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे"

**अट:-** सदर जागा खाजगी गृहनिर्माणाकरीता वापरता येणार नाही.

**टिप:-** क) उक्त फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाची प्रत सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांच्या कार्यालयांत, कार्यालयीन वेळेमध्ये नागरीकांच्या अवलोकनार्थ एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

ख) प्रस्तुत अधिसुचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

(प्रदीप गोहिल)
कार्यासन अधिकारी

**NOTIFICATION**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai-400 032.**
**Dated:- 31st August, 2009**

***The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966***
No. TPS-2407/2962/CR-252/08/UD-9:-Whereas, the Revised Development Plan of Nagpur has been sanctioned by the Government vide Urban Development Department's Notification No. TPS-2496/2643/CR-300(A)/ 97/UD-9, dated 7th January of 2000 and has come into force with effect from 1st March of 2000 (hereinafter referred to as "the said Development Plan");

And whereas, the land bearing Khasara Nos. 109, 110(pt.), 111 & 112(pt.) of Mouje Dabha is included in Agricultural Zone (hereinafter referred to as "the said Lands");

And whereas, the Nagpur Improvement Trust has decided to delete the said Land from Agricultural Zone and to included in Residential Zone and accordingly submitted the modification proposal (hereinafter referred to as "the said Modification Proposal") vide its Marathi letter No. अधी.अभि./रचना/६६८८, dated 10th December, 2007 after following all the legal procedure stipulated under section 37 (1) of the said Act;

And whereas, after consulting the Director of Town Planning, Govt. is satisfied that the said Modification Proposal should be sanctioned with some conditions ;

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of section 37 of the said Act, Govt. hereby sanctions the said Modification Proposal of the said Lands and for that purpose amends the above referred Notification dated 7th January, 2000.

In Schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added after last entry-

**ENTRY**

"The land bearing Khasara Nos. 109, 110(pt.), 111 & 112(pt.) of Mouje Dabha is deleted from Agricultural Zone and land so released is included in Residential Zone as shown on plan subject to following condition-

**Condition:-** The premises should not be used for private housing.

**Note:-** A) A copy of the part plan of aforesaid sanctioned modification is available in the office of the Chairman, Nagpur Improvement Trust, Nagpur during office hours on all working days for inspection of public for a period of one month.

B) This Notification is also available on department's web site www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(Pradeep Gohil)
Section Officer